महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (शिक्षण सक्षमीकरण शाखा) मधील वरिष्ठ अधिव्याख्याता पदाची दि. ०१.०१.२०२३ दि. ३१.१२.२०२३ म्हणजेच दि.०१.०१.२०२४ रोजीची तात्पुरती ज्येष्ठतासूची प्रसिध्द करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः ज्येष्ठता-२१२४/प्र.क्र.१६०/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ३२
तारीख: १८ जुलै, २०२४.

संदर्भ :

१) शिक्षण आयुक्तालय यांचे कार्यालयाचे पत्र क्र .आशिका-२०२४/ज्येष्ठता डायट वरिष्ठ अधिव्याख्याता/आस्था-अ १०५/२०२४/४२३०, दिनांक ०५.०७.२०२४.

**शासन परिपत्रक**

महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (शिक्षण सक्षमीकरण शाखा) या वरिष्ठ अधिव्याख्याता पदावरील दि.०१.०१.२०२३ ते दि. ३१.१२.२०२३ म्हणजेच दिनांक ०१.०१.२०२४ पर्यंतची तात्पुरती ज्येष्ठतासूची सोबतच्या परिपत्रकात प्रसिध्द करण्यात येत आहे.

२. सदर ज्येष्ठतासूची सामान्य प्रशासन विभागाच्या अधिसूचना क्रमांक एसआरव्ही-२०१६/ प्र.क्र.२८१/बारा, दिनांक २१.०६.२०२१ नुसार तयार करण्यात आली आहे.

३. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दिनांक ०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये, दिनांक २५.०५.२००४ चा शासन निर्णय रद्द करुन पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. सदर निर्णयास आव्हानित करण्यासाठी मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल करण्यात आली आहे. सदर विशेष अनुज्ञा याचिकेमधील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून ही ज्येष्ठतासूची निर्गमित करण्यात येत आहे. त्यानुसार सन २००४ नंतरच्या निवडयाद्यांमध्ये बदल झाल्यास त्यानुसार सदर ज्येष्ठतासूचीमध्ये बदल होईल, या अटीच्या अधीन राहून ही तात्पुरती ज्येष्ठतासूची प्रसिध्द करण्यात येत आहे.

४. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरहू ज्येष्ठतासूची सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावी. ज्या अधिकाऱ्यांना ज्येष्ठतायादी संबंधित आक्षेप असतील त्यांनी त्या संदर्भात त्यांचे निवेदन आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत हे आदेश निर्गमित झाल्यापासून दोन आठवडयाच्या आत शासनास सादर करावे. विहीत कालमर्यादेनंतर आलेल्या निवेदनाचा विचार करण्यात येणार नाही. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी विहित कालमर्यादेत प्राप्त झालेली निवेदने त्यांच्या अभिप्रायासह शासनाकडे तात्काळ पाठवावीत.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१८१२१५५५९९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJAY NIVRUTTI BHOSALE

Digitally signed by VIJAY NIVRUTTI BHOSALE
DN: CN = VIJAY NIVRUTTI BHOSALE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SCHOOL EDUCATION ND SPORTS DEPARTMENT
Date: 2024.07.18 12:27:13 +05'30'

**(विजय भोसले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त(शिक्षण), यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य पुणे,
२. सर्व संबंधित अधिकारी आयुक्तालयामार्फत
३. निवडनस्ती/प्रशा-२.

| शालेय शिक्षण विभाग अंतर्गत महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (शिक्षण सक्षमीकरण शाखा) मधील वरिष्ठ अधिव्याख्यता पदावरील अधिकायांची दिनांक १/१/२०२३ ते ३१/१२/२०२३ अखेर म्हणजेच दिनांक ०१/०१/२०२४ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता सूची | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | नांव | प्रवर्ग | जन्मतारीख | नियुक्ती दिनांक | नियुक्तीचा मार्ग | ज्येष्ठता दि./ज्येष्ठ.मानी व दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | अभिप्राय |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| निरंक | | | | | | | | | | |